**ज्येष्ठ विधिज्ञ ॲड. श्री. मुकुल रोहतगी यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**विशेष अनुमती अपिल याचिका (क्रिमिनल) क्र.९५५४/२०१९ या प्रकरणात मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल याचिकेच्या न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-१२१९/प्र.क्र.३९०/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २५ एप्रिल, २०२२

**संदर्भ :-** विधि व न्याय विभाग, शासन पत्र क्र. १४०/क्रिम.जन./२०२१/'अ' शाखा,दि. १६.१२.२०१९.

**शासन निर्णयः-**

विशेष अनुमती अपिल (क्रिमिनल) क्र. ९५५४/२०१९ या प्रकरणात मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल याचिकेच्या अनुषंगाने विशेष समुपदेशी म्हणून काम पाहण्यासाठी संदर्भ क्र.१ अन्वये नियुक्त ज्येष्ठ विधिज्ञ ॲड. श्री. मुकुल रोहतगी यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली**

प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - ११,००,०००/- (रुपये अकरा लक्ष फक्त)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ज्येष्ठ विधिज्ञ ॲड. श्री. मुकुल रोहतगी यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. ज्येष्ठ विधिज्ञ ॲड. श्री. मुकुल रोहतगी यांना व्यावसायिक फीचे प्रदान करण्यासाठी येणारा खर्च मागणी क्र. "बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) २८ व्यावसायिक सेवा" या लेखाशिर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा."

३. ज्येष्ठ विधिज्ञ ॲड. श्री. मुकुल रोहतगी यांना व्यावसायिक फीचे प्रदान करण्यासाठी कोषागारातून निधी आहरित करण्यास्तव, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयातील मागणी क्र. "बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) २८ व्यावसायिक सेवा" हे लेखाशिर्ष हाताळणारे संबंधित नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी यथोचित कार्यवाही करावी.

४. न्यायालयीन कामकाजाचे परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरीक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्तांनी घ्यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं. क्र.१२०/२०२२/व्यय-७ दि.२२.०३.२०२२ अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२५११५४५०४४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VENKATESH BHAT

Digitally signed by VENKATESH BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, pseudonym=4BD2A00BD54D7705C239CA2A5785A87EDE4514EC, serialNumber=6E277C9088A4CB8B53E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH BHAT
Date: 2022.04.25 11:56:12 +05'30'

**(व्यंकटेश भट)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१ , मुंबई.
३. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. ज्येष्ठ विधिज्ञ श्री. मुकुल रोहतगी, ५९, सुंदर नगर, नवी दिल्ली-११०००३
६. विधी व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती (पोल-१०).